मुख्यमंत्री ग्राम सडक योजना संशोधन व विकास अंतर्गत सातारा जिल्ह्यातील पॅकेज क्र. RD SAT-१९ मधील प्रजिमा-६७ ते विंचुर्णी रस्ता ता. फलटण या कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः** मुग्रायो-२०२३/प्र.क्र. ७७० /बांधकाम-४

५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१

तारीख: १५ मार्च, २०२४

**वाचा :**

१) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०१९/प्र.क्र.६४८/बांधकाम-४, दिनांक २२ ऑगस्ट, २०१९.

२) **मुख्य अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांचे पत्र क्रमांकः** मु.अ./प्रमंग्रासयो/२०७४/२०२३, दिनांक ०७ जून, २०२३.

**प्रस्तावना :**

मुख्यमंत्री ग्राम सडक योजना संशोधन व विकास अंतर्गत सातारा जिल्ह्यातील पॅकेज क्र. RD SAT -१९ मधील प्रजिमा-६७ ते विंचुर्णी रस्ता ता. फलटण या रस्त्याच्या कामास ग्राम विकास विभागाच्या उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक २२ ऑगस्ट, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू. ३१७.९० लक्ष इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

०२. सदर रस्त्याच्या कामाच्या काही बाबींच्या भौतिक परिमाणात वाढ झाल्याने व त्यानुषंगाने बांधकाम साहित्याच्या गौण खनिज स्वामित्वधन ची रक्कम, वस्तु व सेवा कर तसेच भाववाढ कलमा अंतर्गत देय रकमेच्या वाढीमुळे सदर कामाच्या मुळ किंमतीमध्ये वाढ झाल्याने सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव, मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांच्या उक्त वाचा मधील अ.क्र.२ येथील दिनांक ०७ जून, २०२३ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेला आहे.

०३. विषयांकित रस्त्याच्या कामाच्या मुळ किंमतीमध्ये वर नमूद कारणांमुळे वाढ झाल्याने सदर कामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

मुख्यमंत्री ग्राम सडक योजना संशोधन व विकास अंतर्गत सातारा जिल्ह्यातील पॅकेज क्र. RD SAT -१९ मधील प्रजिमा-६७ ते विंचुर्णी रस्ता ता. फलटण या रस्त्याच्या कामाच्या किंमतीमध्ये प्रस्तावनेत नमुद कारणांमुळे वाढ झाल्याने सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता आहे.

०२. उपरोक्त प्रमाणे कामाच्या अंतिम किंमतीमध्ये खालील प्रमाणे वाढ होत आहे.

(रू. लक्ष)

| पॅकेज क्रमांक | कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता किंमत | निविदा रक्कम | सुधारीत खर्च | प्रशासकीय मान्यता रक्कमेपेक्षा अधिकचा खर्च | प्रशासकीय मान्यता रकमेपेक्षा जास्तीच्या खर्चाची टक्केवारी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| RD SAT -१९ | प्रजिमा-६७ ते विंचुर्णी रस्ता ता. फलटण | ३१७.९० | २५४.२७ | ३६२.६३ | ४४.७३ | १४.०७ |
| **एकूण** | | **३१७.९०** | **२५४.२७** | **३६२.६३** | **४४.७३** | **१४.०७** |

०३. उपरोक्त आर्थिक विश्लेषनानुसार काम पुर्ण करावयाचे झाल्यास रू. ३६२.६३ लक्ष इतका अंतिम खर्च असुन, सदर कामाच्या प्रशासकीय रक्कमेच्या १४.०७ % जास्तीचा म्हणजेच रू. ४४.७३ लक्ष जास्तीचा आहे.

०४. वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग तीन अनुच्छेद क्र.६ (२७ अ) नुसार, सुधारीत अंदाजातील अधिक्य सुरूवातीस मंजूर केलेल्या अंदाजित खर्चाच्या १५ % मर्यादेपर्यंत मंजुर करण्याचे पुर्ण अधिकार प्रशासकीय विभागास आहे. त्यानुसार मुख्यमंत्री ग्राम सडक योजना संशोधन व विकास अंतर्गत सातारा जिल्ह्यातील पॅकेज क्र. RD SAT -१९ मधील प्रजिमा-६७ ते विंचुर्णी रस्ता ता. फलटण या रस्त्याच्या कामास रू. ३६२.६३ लक्ष इतक्या रकमेस खालील नमुद केलेल्या अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४.१ सदर काम ग्राम विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत, प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर व ग्राम विकास विभागाच्या अटी व शर्तीवर कार्यान्वीत करण्यात यावे.

४.२ ज्या कारणाकरिता अधिक्याचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे, तो या कामाकरिताच्या मंजुर निविदेमधील सर्व अटी, शर्ती (Terms and Conditions) व तरतूदींच्या अनुषंगानेच आहे, याची खातरजमा ठेकेदारास प्रत्यक्ष अधिक्याची रक्कम प्रदान करण्यापूर्वी करावी.

४.३ कामाची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा व विहित निविदा कार्यपद्धती अनुसरण्यात यावी.

४.४ सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी, निविदाविषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही.

४.५ सदर कामांची नोंद मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी तयार करण्यात आलेल्या संगणक प्रणालीमध्ये संबंधित कार्यकारी अभियंता यांनी त्वरीत करावी.

४.६ या कामावरील खर्च सुधारित अंदाजित खर्चाच्या मर्यादेत ठेवण्यात यावा व त्यापेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

**०५.** सदर कामावरील खर्च "मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (००)(०१), मुख्यमंत्री ग्रामीण मार्ग योजना नवीन रस्ते बांधणे व अस्तित्वातील रस्त्यांचे नुतनीकरण, ५३ मोठी बांधकामे सीआरसी-५०५४ ५१५३" या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०३१५१५५१०११३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c50542 2af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F 3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.03.15 17:34:00 +05'30'

**(प्रशांत पाटील)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.विधानसभा व, मा.विधानपरिषद, सदस्य. विधानमंडळ, मुंबई.
२) प्रधान सचिव. (ग्रा.वि. व पं.रा.), बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यलय सातारा.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा.
६) खाजगी सचिव, मा. मंत्री (ग्रा.वि.) मंत्रालय मुंबई-३२.
७) मुख्य अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
८) अधीक्षक अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे विभाग पुणे.
९) कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.),महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सातारा.
१०) कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, सातारा.
११) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
१३) माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री/मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य.
१४) निवड नस्ती, कार्यासन बांध-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.